राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) सेंद्रीय शेती सन २०१७-१८ चा अनुसुचित जाती प्रवर्गाचा ३२६ गटांचा रु. १३९.६२ लाख इतका अखर्चित निधी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.
( केंद्र हिस्सा रु.८३.७७ लाख व राज्य हिस्सा रु.५५.८५ लाख )

महाराष्ट्र शासन.
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक :संकीर्ण १६१८/ प्र.क्र. २६२/ १७ अे
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०१८

वाचा : १) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना.
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशेयो /१२१४प्र.क्र.२६६/१७, दि.२०.०२.२०१६.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.९-३९/२०१५/Org.Fmg, दि.०२ जुन, २०१७.
४) केंद्र शासनाचे क्र. २-१/२०१७-Org.Fmg, दि. १८ सप्टेंबर, २०१७ चे तीन पत्र.
५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/प्र.क्र.३३/२०१७-१८/सेंशे/६८०/२०१७, दि.१६.११.२०१७
६) शासन निर्णय क्र. सेंशेयो/१२१७ प्र.क्र .२१०/१७-अे, दि. २४ जानेवारी, २०१७
७) शासन निर्णय शुध्दीपत्रक क्र. सेंशेयो/१२१७ प्र.क्र.२१०/१७-अे , दि. २९ जानेवारी, २०१८
८) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: पुरक २५१७/प्र.क्र. २४३/१७-अे, दि. २१/०२/२०१८
९) केंद्र शासनाचे क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg, दि. १ जून, २०१८
१०) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. पकृवियो/निधी पुनरु/प्र.क्र. ५-२०१८/ ३८६/२०१८, दि. १२ जून, २०१८

प्रस्तावना -:

राज्य शासनाने केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत ‘परंपरागत कृषि विकास योजना’ ( सेंद्रिय शेती) ( Paramparagat Krishi Vikas Yojana - PKVY (organic farming) ही योजना सन २०१५-१६ पासून केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्याचा निर्णय संदर्भाधिन क्रमांक ०२ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. यामध्ये सध्या ९३२ गटांचा तीन वर्षाचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे. नवी दिल्ली येथे दिनांक ११मे, २०१७ रोजी परंपरागत कृषी विकास योजनेची तिसरी कार्यकारी समितीची बैठक झाली. सदर बैठकीमध्ये केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याकरिता नवीन ३२६गट मंजूर केलेले आहेत. त्यानुषंगाने राज्य शासनाने अनु.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये ३२६ गटांचा कार्यक्रम राबविण्यासाठी प्रथम वर्षासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भाधिन क्रमांक ०४ येथील दिनांक १८.०९.२०१७ रोजीच्या तीन पत्रान्वये नवीन ३२६ गटांचा प्रथम वर्षाचा कार्यक्रम राबविण्याकरिता

सन २०१७-१८ करिता रू.२३२७.०१ लाख इतका रकमेचा नियतव्यय मंजूर केलेला होता. त्यामध्ये केंद्र हिस्सा रू. १३९६.२१ लाख इतका असून राज्य हिस्सा रू.९३०.८० लाख इतका आहे. त्यापैकी, अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता असलेला निधी रु. ८३.७७ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. ५५.८५ लाख निधी असा एकूण रु. १३९.६२ लाख इतका निधी सन २०१७-१८ करीता संदर्भ क्र. ८ अन्वये वितरीत करण्यात आलेला होता. सदर निधी आर्थिक वर्षा अखेर अखर्चित राहिला असल्याने, सदर निधी सन २०१८-१९ या वर्षात खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. ९ येथील पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

अखर्चित निधीमध्ये अनुसूचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा रु. ८३.७७ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. ५५.८५ लाख निधी असा एकूण रु. १३९.६२ लाख इतक्या अखर्चित निधी सन २०१८-१९ या वर्षात खर्च करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णयः-</u>**

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत **परंपरागत** कृषि विकास योजना (सेंद्रिय शेती) या योजनेमधील नवीन ३२६ गटांसाठी पहिल्या वर्षासाठी सन २०१७-१८ मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी रु. ८३.७७ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. ५५.८५ लाख अशी एकूण रुपये १३९.६२ लाख (रुपये एक कोटी एकोणचाळीस लाख बासष्ट हजार फक्त) निधी पुनर्जिवित करून सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **प्रवर्ग** | **केंद्र हिस्सा (६० %)** | **राज्य हिस्सा (४०% )** |
|---|---|---|
| अनुसूचित जाती | रु. ८३.७७ लाख | रु. ५५.८५ लाख |
| **एकूण वितरीत करावयाचा निधी ( केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा)** | | **रू. १३९.६२ लाख** |

**२.** या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**<u>मागणी क्र. डी - ३,</u>** २४०१ पीक संवर्धन, (००) ,७८९ अनुसूचित जाती उपयोजना, (००) (२७) कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजना)केंपुयो) (केंद्र हिस्सा ६० % ) २४०१ अे (७०८-३३ अर्थसहाय्य

**<u>मागणी क्र. डी</u>** <u>- ३,</u> २४०१ पीक संवर्धन, (००) ,७८९ अनुसूचित जाती उपयोजना, (००) (२८) कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजना ) केंपुयो ) ( राज्य हिस्सा ) ( % ४० २४०१ अे ७१७) (योजनांतर्गत) ३३ - अर्थसहाय्य

३. सदर निधी अनु.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार व सदर शासन निर्णयात नमूद केलेल्या बाबींवर अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

**४. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.त्याप्रमाणे अनुसूचित

जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५) केंद्र शासनाने अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या वितरीत केलेला निधी त्याच लाभार्थी शेतकऱ्यांसाठी खर्च करण्यात यावा.

६) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही. याबाबत कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि आयुक्तालय, पुणे यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी

**५.** कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, पुणे हे योजनचे नियंत्रण अधिकारी म्हणून काम पाहतील. सहाय्यक संचालक लेखा १- कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक /तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी PFMS पध्दतीने अनुदानाची जिल्हानिहाय वितरणांची कार्यपध्दती राबविणे बंधनकारक राहील, त्यामुळे जिल्हास्तरावर जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

**६.** प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभागाचे परिपत्रक दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तीची कृषि आयुक्तालयाने पूर्तता केली आहे. या अटीच्या अधीन त्याचप्रमाणे सामाजिक न्याय विभागाच्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००८१४४१०३१८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e674 33a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.10.08 14:45:57 +05'30'

**(प्रकाश रा. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषी )/ मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) अपर मुख्य सचिव (कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग) मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त ( कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
५) कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१३) नियोजन विभाग-१४३१, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवडनस्ती